**महाराष्ट्र पाटबंधारे वित्तीय कंपनी, मर्यादित मार्फत मालिका क्रमांक IV द्वारे उभारलेल्या कर्जरोख्यांवरील व्याज अदा करण्यासाठी तरतूद वितरीत करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**नियोजन विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः एमपीव्हीसीएल-२०१८/प्र.क्र.२६/का.१४३३**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
दिनांक: ०२ जुलै, २०१८

वाचा :-

१) शासन निर्णय क्रमांकः नि.वि.क्र.पाविम-२००२/प्र.क्र.४२/का.१४६१, दिनांक :- २७/०९/२००२.

प्रस्तावना :-

राज्यातील पाच पाटबंधारे महामंडळांना निधी उपलब्ध करण्यासाठी खुल्या बाजारातून कर्जरोख्याद्वारे निधीची उभारणी करुन या निधीचे वाटप मा.राज्यपालांच्या निदेशानुसार करण्यासाठी महाराष्ट्र शासनाने संदर्भ क्र.१ येथील शासन निर्णयान्वये "महाराष्ट्र पाटबंधारे वित्तीय कंपनी मर्यादित" यांनी विशेष हेतु वहन (SPV) कंपनीची स्थापना केली आहे. सदर कंपनीचे कामकाज व व्यवस्थापन मे.सिकॉम लि. यांचे मार्फत केले जाते. कर्जरोखे मालिका I,II,III, व IV द्वारे कंपनीने एकूण ₹ . ७९८.२५ कोटी मुद्दल उभारलेले असून त्याचे वाटप जलसंपदा विभागांतर्गत पाच पाटबंधारे विकास महामंडळाना करण्यात आले आहे. या कर्ज रोख्यांच्या मुद्दल व व्याजास शासनाने हमी दिलेली आहे. कर्जरोखे मालिका क्रमांक I, II व III चे पूर्णत: विमोचन (Redemed) करण्यात आले आहे. कर्जरोखे मालिका क्रमांक IV ची मुद्दल व व्याज अदा करणे बाकी आहे. महाराष्ट्र पाटबंधारे वित्तिय कंपनी मर्यादित यांनी मागणी केलेली कर्जरोखे मालिका क्रमांक IV वरील व्याज ₹. ४,०८,८५,०००/- (रूपये चार कोटी आठ लाख पंच्याऐंशी हजार फक्त) अदा करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय-**

महाराष्ट्र पाटबंधारे वित्तीय कंपनी मर्यादित यांनी उपरोक्त नमूद प्रयोजनासाठी मागणी केलेली ₹ . ४,०८,८५,०००/- (रूपये चार कोटी आठ लाख पंच्याऐंशी हजार फक्त) इतकी रक्कम महाराष्ट्र पाटबंधारे वित्तीय कंपनी मर्यादितला अदा करण्यास शासन याद्वारे मंजूरी देत आहे. महाराष्ट्र पाटबंधारे वित्तीय कंपनी मर्यादित यांनी उभारलेल्या कर्जरोखे मालिका क्रमांक IV वरील व्याज दिनांक १५ जुलै, २०१८ पूर्वी अदा करणे आवश्यक आहे.

२. सदर रक्कम ₹.४,०८,८५,०००/- (रूपये चार कोटी आठ लाख पंच्याऐंशी हजार फक्त) कोषागारातून काढून ती महाराष्ट्र पाटबंधारे वित्तिय कंपनीस अदा करण्यासाठी आहरण व संवितरण अधिकारी म्हणून श्री. नितीन पालकर, कार्यासन अधिकारी ,रोख शाखा, नियोजन विभाग आणि नियंत्रक अधिकारी म्हणून

श्रीमती प्र.सं.महाले, उप सचिव, नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई-४००० ३२ यांना घोषित करण्यात येत आहे. त्यांनी सदर रक्कम शासन निर्णय, वित्त विभाग, क्र. संकीर्ण १०१०/प्र.क्र. ६८/ कोषाप्र-५, दिनांक १८.०४.२०११ मधील तरतुदीनुसार महाराष्ट्र पाटबंधारे वित्तीय कंपनी मर्यादित यांना अदा करावी.

३. वरील प्रयोजनासाठीचा खर्च मागणी क्र.ओ-१२, मुख्य लेखाशीर्ष, **"५४६५-सर्वसाधारण वित्तिय व व्यापारी संस्थांमधील गुंतवणूका, ०१- सर्वसाधारण वित्तिय संस्थांमधील गुंतवणूका,१९०-सार्वजनिक क्षेत्रातील व इतर उपक्रमांना कर्जे (०१)- महाराष्ट्र पाटबंधारे वित्तिय कंपनी मर्यादितसाठी भागभांडवल व सेवा खर्च (०१)(०१)-महाराष्ट्र पाटबंधारे वित्तिय कंपनी मर्यादितसाठी भाग भांडवल व सेवा खर्च (अनिवार्य) (५४६५ ००४६) ५४,गुंतवणूका"** या खाली सन २०१८-१९ या वित्तिय वर्षासाठी मंजूर असलेल्या तरतुदीमधून भागविण्यांत यावा.

४. सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या मान्यतेने त्यांच्या अनौपचारिक संदर्भ क्र. १८१/व्यय -८, दिनांक १२.६.२०१८ अन्वये निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०१८०७०२१६२८५७६११६ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Anil Dattatraya Joshi

Digitally signed by Anil Dattatraya Joshi
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Planning Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=d7de9577f1b6301ba91e582c9402233953565e9fd17971ff1b7a2b8a94cf42c6, cn=Anil Dattatraya Joshi
Date: 2018.07.02 16:30:14 +05'30'

**( अ.द.जोशी )**

उप सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१) मा.विरोधी पक्षनेता, महाराष्ट्र विधानसभा/विधानपरिषद, विधानभवन, मुंबई.
२) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) , महाराष्ट्र राज्य-१/२, मुंबई/नागपूर.
३) महालेखापाल (लेखा परीक्षा), महाराष्ट्र राज्य-१/२, मुंबई/नागपूर.
४) अधिदान व लेखाधिकारी, मुंबई.
५) निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई.
६) व्यवस्थापकीय संचालक, मे. सिकॉम लि. सॉलिटेअर कार्पोरेट पार्क,बिल्डींग -४, अंधेरी-घाटकोपर लिंक रोड, चकाला, अंधेरी(पूर्व), मुंबई -४०० ०९३.
७) प्रबंधक, महाराष्ट्र पाटबंधारे वित्तीय कंपनी लिमिटेड, द्वारा मे. सिकॉम लि. सॉलिटेअर कार्पोरेट पार्क, बिल्डींग नं-४, अंधेरी-घाटकोपर लिंक रोड, चकाला, अंधेरी (पूर्व), मुंबई -४०० ०९३.
८) उप सचिव (रोख शाखा), नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई.

९) कक्ष अधिकारी, (रोख शाखा), नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई (५प्रती).
१०) कक्ष अधिकारी ,का. १४२४, नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई.
११) वित्त विभाग, व्यय-८, / अर्थसंकल्प-१६/अर्थबळ/अर्थोपाय /ऋण व हमी.
१२) निवड नस्ती का-१४३३, नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२.